अन्नधान्याचा सांठा होऊं शकतो हें एकदां निश्चित झाल्यामुळेंच मानवांची संख्या इतकी भरमसाट वाढत सुटली. लोकसंख्या वाढली कीं कांहींना आराम मिळतो. कारण बऱ्याच लोकांना लागणारें अन्न-धान्य पिकवायला कांही बरींच माणसें लागत नाहींत. थोड्या माणसांनी तें काम सहज होऊं शकतें. म्हणजे समाजांतील कांही माणसें दुसऱ्या गोष्टींचा विचार करावयाला किंवा दुसरें काम करून पाह्यला मोकळी होतात. त्यामुळेंच कांहीं जणांना त्यांच्या आवडत्या गोष्टींत विशेष प्राविण्य मिळवणें शक्य होतें. कांही लोक विचार करूं लागतात, निरनिराळ्या योजना करतात आणि इतरे जनांकरितां शोध लावण्याचें काम पण करूं शकतात. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे शेतींमुळें मानवप्राणी पिढ्यान् पिढ्या एका जागीं स्थायिक होऊं शकतो. असा स्थायिकपणा आल्यानंतरच कलेचा प्रादुर्भाव होतो. मानवजात जोंपर्यंत शिकारीचें भटके जीवन जगत होती तोंपर्यंत आज इथें तर उद्यां तेथें असा प्रकार चाले. अशा अनिश्चित भटक्या जीवनांत सुंदर सुदर वस्तूची निर्मिती करणें केवळ अशक्य होतें. तुम्हांला आठवतच असेल, कलावंत असलेला क्रोमॅग्नान माणूस भटक्या नव्हता. तो एका जागीं राहात असे; पण जेव्हां का त्याच्यावर भटकायची पाळी आली तेव्हां त्याची कला साफ मेली. तुम्ही कांहीं काळ एके ठिकाणी राह्यला आणि पुढच्या काळांत जर दुसरीकडे जाणार असाल, तर प्रथम राहात असलेल्या ठिकाणी सुंदर सुदर चित्रें काढून रंगविण्यांत किंवा सुदर शिल्पाकृतीची निर्मिती करण्यांत काय अर्थ? आज माणूस येथें आहे आणि उद्यां तो सारें मागें सोडून दुसरीकडे जाणार आहे. असें जर व्हायचें असेल तर सुदर घर बांधून त्यांत सुंदर सुदर गोष्टी ठेवून तें सजविण्यांत तरी काय फायदा ? आपल्या भोंवती अशा छान छान गोष्टी असाव्या अशी कल्पना सुद्धां भटक्या जीवनांत येणें कठीण; पण एकदां का गहूं, तांदूळ, मका या सर्वांचा किंवा यांपैकीं कोणत्याहि एकाचा साठा करून आपण त्यावर अवलंबून राहूं शकतो, अशा माणसाची खात्री झाली कीं त्याचें मन चिरकाल टिकतील अशा गोष्टी बांधण्याकडे वेधू लागतें. अशाच वेळीं कलानिर्मिति होऊं लागते व तिचा विकारहि होतो. अशा जीवनपरिस्थितींतच धर्माचा त्याच्या जीवनावर चांगलाच पगडा बसतो, देवालयें बांधलीं जातात, चित्रें रंगविलीं जातात, पुतळे उभे होतात. लेखन-

कलेचा शोध लागतो. नगरें जन्माला येतात.

शेतीचा शोध लागेपर्यंत मानवी प्रगतीचें पाऊल फारच धीरेधीरे पडत होतें; पण शेतीचा एकदां शोध लागल्यानंतर अन्नाची काळजी करण्याचें कारण उरलें नाहीं. त्यानंतर मानवाची प्रगति उड्या मारीत धांवूं लागली. पृथ्वीवरच्या अत्यंत पूर्वकालच्या आदिमानवाची, जगांतील पहिल्या माणसाच्या जीवनकथेची ही अशी गाथा आहे.

लाखों वर्षें, मानवाची ही वाटचाल हळूहळू चाललीच होती. तेव्हां त्याच्याजवळ असलेल्या कला म्हणजे फक्त त्याची ओबडधोबड रांगडी भाषा यापलीकडे कांहींच नव्हतें. अग्नि हेंच एक त्याचें एकमेव सुखस्थान होतें. पहिल्या प्रथम तो त्याला जेथें जेथें मिळाला तेथून तो उचलून घेत असे. हळूहळू तो शिकार करायला शिकला. मोठ्या कष्टानें तो गारगोटीच्या कपारी कशा तीक्ष्ण कराव्या तें शिकला. कांहीं लाख वर्षें तो तेवढेंच करीत राहिला. म्हणजे शिकार करी, कपारींना धार आणण्याचा प्रयत्न करी. नंतर कांहीं दिवसांनीं त्याला विस्तव पेटविण्याची कला साधली. खूपच उशीरां जवळजवळ शेवटींच म्हणा ना. त्यानें भाला फेंकून मारण्याचें साधन तयार केलें. त्यानंतर धनुष्यबाण आला. पुढें त्यानें कुत्राहि माणसाळवला. शिवाय तो भांडींहि करायला शिकला. इतकी वाटचाल झाल्यावर अगदीं शेवटीं त्याला शेतकीचें ज्ञान आलें. हें ज्ञान म्हणजे लहानसहान गोष्ट नव्हती. फार महान् मानवी प्रगतीची ती नुसती पहांटच झाली होती.


विज्ञान
विश्व